राज्य योजना सन २०२१-२२
वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना या योजनेचा
(२४०६-२२३२) चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०९.२१/प्र. क्र. २४६/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ०१.११.२०२१.

**वाचा :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०५१८/प्र.क्र.२०४/फ-१, दि. ०२ नोव्हेंबर, २०१८.
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डल्ब्यूएलपी-०७.२०/प्र.क्र.११०/फ-१, दि. ०९ ऑक्टोबर, २०२०.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१.
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१ / पी / यो /चाबाप्र / प्र.क्र. ५८/(२१-२२)/२१३, दि. २७.०८.२०२१.
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०९.२१/प्र.क्र.२४६/फ-१, दि. २८ ऑक्टोबर, २०२१

**प्रस्तावना :-**

सन २०२१-२२ मध्ये राज्यस्तरीय योजनेअंतर्गत वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) या लेखाशिर्षामध्ये रुपये ६०००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. तथापि वित्त विभागाने संदर्भ क्रमांक ४ च्या शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ मध्ये निधी वितरणाच्या अनुषंगाने जारी केलेल्या मार्गदर्शक सूचनांन्वये उपरोक्त लेखाशिर्षाअंतर्गत रु. ११००.०० लक्ष निधी विभागामार्फत राखीव ठेवण्यात आला आहे. त्यामुळे संदर्भ क्रमांक ६ चा शासन निर्णय रद्द करण्यात येत असून पूढील निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ५ च्या पत्रान्वये सादर केलेले प्रस्ताव व वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) या योजनेंतर्गत उपलब्ध निधीच्या अनुषंगाने सदर शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून सोबत जोडलेल्या प्रपत्रानुसार पुणे वन विभागाच्या बावधन येथील वन्यप्राणी उपचार केंद्राच्या स्थापनेकरीता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे एकूण **रु. ११००.०० लक्ष** निधी वितरीत करण्यात येत आहे.

| लेखाशिर्ष | उद्दिष्ट | शासनाने वितरीत केलेला निधी (रु. लाखात) |
|---|---|---|
| वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) | ०२-मजुरी | ६६०.०० |
| | २१-पुरवठा व सामग्री | ४४०.०० |

I. सदर योजनेवर होणारा खर्च सन २०२१-२२ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीव, पंचवार्षिक योजनाअंतर्गत, राज्य

योजनांतर्गत योजना (००) (१०) वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

II. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

III. सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ व वन (संवर्धन) अधिनियम, १९८० तसेच राष्ट्रीय प्राणी संग्रहायलयाच्या मार्गदर्शक तत्वांचा भंग होणार नाही व आवश्यक ती परवानगी घेतली गेली आहे ह्याची दक्षता घ्यावी.

IV. प्रस्तावात नमूद ज्या कामांना सक्षम प्राधिकाऱ्यांची प्रशासकीय मंजूरी मिळाली आहे त्यावरच वितरीत अनुदान खर्च होईल याची खातरजमा करण्यात यावी.

V. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

VI. प्रस्तावित असलेल्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

VII. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

VIII. सदर योजनेच्या अनुषंगाने विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वे व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

IX. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१ व वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१ व वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११०११२१००००५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2021.11.01 12:12:52 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) पुणे.
६. उपवनसंरक्षक (प्रादेशिक) पुणे.
७. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

**महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०९.२१/प्र.क्र. २४६/फ-१, दिनांक :- ०१.११.२०२१ सोबतचे प्रपत्र.**

| अ.क्र. | कामाचा तपशील | निविदा मान्यतेची रक्कम (रु. लाखात) |
|---|---|---|
| १ | पुणे वन विभागातील मौजे बावधन येथील वन्यप्राण्यांचे उपचार केंद्र कर्मचारी व प्राणी देखरेख शाखा | २९७.०७ |
| २ | पुणे वन विभागातील मौजे बावधन येथील वन्यप्राण्यांचे उपचार केंद्र पशुचिकित्सालय | |
| ३ | पुणे वन विभागातील मौजे बावधन येथील वन्यप्राण्यांचे उपचार केंद्र बर्नीग शेड व शवपरिक्षण गृह | |
| ४ | पुणे वन विभागातील मौजे बावधन येथील वन्यप्राण्यांचे उपचार केंद्रात हरिणांकरता प्राणीघर | ५३६.५४ |
| ५ | पुणे वन विभागातील मौजे बावधन येथील वन्यप्राण्यांचे उपचार उपचार केंद्रात तृणभक्षीय वर्गीय प्रजातींसाठी प्राणीघर | |
| ६ | पुणे वन विभागातील मौजे बावधन येथील वन्यप्राण्यांचे उपचार केंद्रात सस्तन प्राण्यांसाठी प्राणीघर | |
| ७ | पुणे वन विभागातील मौजे बावधन येथील वन्यप्राण्यांचे उपचार केंद्र रस्ते व ड्रेनेज कामे | १०८५.७६ |
| ८ | पुणे वन विभागातील मौजे बावधन येथील वन्यप्राण्यांचे उपचार केंद्र रस्ते, क्रॉस ड्रेनेज कामे संरक्षण भिंत, ग्राऊंड स्टोरेज रिझ्रवॉयर, एलिकेटेड स्टोरेज रिझ्रवॉयर, पाणी पुरवठा यंत्रणेची कामे, ड्रेनेज सिस्टम अंतर्गत कामे, सांडपाणी उपचार केंद्र | |
| | **एकूण मंजूर निविदा रक्कम** | **१९१९.३७** |
| ९ | **कन्सलटंट फी** | **८९.२६** |
| १० | **जी.एस.टी १२% (निविदा रक्कमेवर)** | **२३०.३३** |
| ११ | **कामगार विमा ०.५% (निविदा रक्कमेवर)** | **९.६०** |
| | **एकूण** | **२२४८.५६** |

*******